महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली
सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना
अनुज्ञेय रक्कम मंजूर करणेबाबत.
लेफ्टनंट जनरल सुदर्शन श्रीकांत हसबनीस,
जि.पुणे.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मगौपु-२०१६/प्र.क्र.३१९/२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: - ११/११/२०२०.

वाचा-

१) शासन निर्णय,सा. प्र. वि. क्र. मगौपु-२०१७ /प्र. क्र. ३६०/२८, दिनांक ३१.०१.२०१९
२) शासन निर्णय,सा. प्र. वि. क्र. मगौपु-२०१६ /प्र. क्र. २४७/२८, दिनांक ०२.०३.२०१९
३) शासन निर्णय,सा. प्र. वि. क्र. मगौपु-२०१६ /प्र. क्र. ३१९/२८, दिनांक ०६.१२.२०१६
४) संचालक,सैनिक कल्याण विभाग,पुणे यांचे पत्र क्र.१६२११/गौ.पु/प्रस्ताव/सैकवि-१६/१०७८ दिनांक २७/१०/२०२०.

प्रस्तावना-

संदर्भ क्र. १ अन्वये भारताच्या सैन्य दलातील अधिकाऱ्यास/सैनिकास मा. राष्ट्रपती यांच्याकडून शौर्यपदक किंवा सेवापदक प्रदान करण्यात आल्यास,विविध पदकनिहाय आर्थिक मदत देण्यात येते. तसेच संदर्भ क्र. २ अन्वये राज्यातील आजी/माजी सैनिकांना शौर्य/सेवा पदक यासंवर्गात एकापेक्षा जास्त पदके प्राप्त झाल्यास महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेअंतर्गत प्रत्येक शौर्य/सेवा पदकासाठी स्वतंत्र अनुदान देण्याची तरतूद आहे. **आय सी-३९४४५-एच लेफ्टनंट जनरल सुदर्शन श्रीकांत हसबनीस** यांना राष्ट्रपती सचिवालयाच्या अधिसूचना क्र. सं. २०- प्रेस/२०१९, दि. २६ जानेवारी, २०१९ अन्वये **परम विशिष्ट सेवा पदक** हे पदक प्रदान करण्यात आले आहे. त्यानुसार **लेफ्टनंट जनरल सुदर्शन श्रीकांत हसबनीस** यांना रु. ४,००,०००/- इतके अनुदान देण्याचा प्रस्ताव संचालक,सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये सादर केला आहे.

**शासन निर्णय-**

उपरोक्त नमूद शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली अनुदानाची रक्कम देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १. | आय सी-३९४४५-एच लेफ्टनंट जनरल सुदर्शन श्रीकांत हसबनीस PVSM,VSM,ADC DCOAS (P&S) Sectt IHQ of MoD (Army), २६२, South Block, New Delhi - ११००११ | **परम विशिष्ट सेवा पदक** | २६ जानेवारी, २०१९ | ४,००,०००/- |
| | | | **एकूण** | **४,००,०००/-** |

२. महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेअंतर्गत अनुज्ञेय ठरविलेल्या रक्कमेपैकी ५० % म्हणजे रु.२,००,०००/- (रू. दोन लाख फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ५० % रक्कम म्हणजे रु.२,००,०००/- (रू. दोन लाख फक्त) मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु.२,००,०००/- (रू. दोन लाख फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० -इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.सदरची रक्कम जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे यांनी कोषागार कार्यालय, पुणे येथून आहरीत करुन संबंधितांना विहीत पध्दतीने वितरीत करण्यात यावी.

५. वरील तक्त्यात नमूद केलेली संबंधित रक्कम लाभार्थ्याची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, **क्र मगौपु-२०१७/प्र. क्र. ३६०/२८, दिनांक ३१.०१.२०१९** मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११११७४०३१४४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev R
Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, serialNumber=78be615e7dd51ebb89a43e2d8f1b14979bf8f5ae2c63e3a7fe41c5716996cd4b, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2020.11.11 17:43:12 +05'30'

**( संजीव केळुसकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१.महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई,
२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई,
३.महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,
४.कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५.जिल्हाधिकारी, पुणे,
६.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
७.संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८.जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे,
९.सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मुंबई
११ आय सी-३९४४५-एच लेफ्टनंट जनरल सुदर्शन श्रीकांत हसबनीस PVSM,VSM,ADC,DCOAS (P&S) Sectt IHQ of MoD (Army), २६२, South Block, New Delhi - ११००११
१२.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१३.प्रत संग्रहार्थ.